**शिर्डीतील २४ रस्ते विकास कामासाठी शिर्डी नगरपंचायतीस अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सासंवि- १०१८/८१४/प्र.क्र.७१/का.१६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० जानेवारी, २०१९.

**संदर्भ :-** १) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे पत्र जा.क्र.एसएसएस/बांधकाम/४३२/२०१८, दि.२४.०४.२०१८
२) श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी येथील व्यवस्थापन समितीच्या दि.१४.११.२०१७ रोजीच्या सभेतील निर्णय क्र.२६

**प्रस्तावना :-**

मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांच्या संदर्भाकीत पत्र क्र.१ अन्वये शिर्डी येथील २४ रस्त्यांच्या विकसनासाठी शिर्डी नगरपंचायतीस श्री साईबाबा संस्थानामार्फत रु.८,९७,८२,३००/- इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यास तसेच सदर कामाची निविदा प्रक्रिया शिर्डी नगरपंचायतीमार्फत करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता.

२. श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी येथील व्यवस्थापन समितीच्या दि. १४.११.२०१७ रोजीच्या सभेतील निर्णय क्र.२६ अन्वये प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे.

३. उपरोक्त रकमेच्या अंदाजपत्रकाची छाननी करण्याची विनंती सार्वजनिक बांधकाम विभागाला केली असता, सार्वजनिक बांधकाम विभागाने रस्त्याच्या कामासाठी IRC-५८ मधील मानकानुसार GSB-२५०, DLC-१५० व PQC-M३० ची अंदाजपत्रकामध्ये तदतुद करण्यात यावी. तसेच उर्वरित रस्त्यांच्या अंदाजपत्रकामधील तरतुदी IRC-३७ च्या मानकाप्रमाणे नसतील, त्यामधील तरतुदी IRC-३७ च्या मानकाप्रमाणे करावीत व तसे कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, संगमनेर यांनी सुधारित आणि प्रमाणित करुन तद्नंतरच त्यास तांत्रिक मान्यता देणेबाबत कार्यवाही करावी तसेच सुधारित अंदाजपत्रके तांत्रिक मान्यतेसह प्राप्त झाल्यास सदर रस्त्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विधि व न्याय विभागाकडून कार्यवाही करण्यात यावी, असे अभिप्राय दिले होते.

४. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अभिप्रायाच्या अनुषंगाने कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यांनी प्रस्तावित विकास कामाचे अंदाजपत्रके ही शिर्डी शहरातील वसाहत अंतर्गत रहिवास भागातील असून अत्यंत कमी रहदारीची आहेत. त्यामध्ये कोणत्याही प्रकारची अवजड वाहतूक नसून फक्त हलकी वाहतूक आहे. त्यामुळे सदर रस्त्यासाठी IRC मानकानुसार तरतुद करण्याची किंवा सुधारित करण्याची आवश्यकता नाही, असे अभिप्राय दिले.

५. शिर्डी विकास आराखडयातील रस्त्याचे विकसन तसेच शिर्डी शहरातील अंतर्गत रस्त्याचे विकसन यासह या सर्व रस्त्यांची देखभाल दुरुस्ती शिर्डी नगरपंचायतीमार्फत करण्यात येत असल्याने शिर्डी शहरातील २४ रस्त्यांच्या विकसनासाठी रु.८.९८ कोटी इतके अनुदान शिर्डी नगरपंचायतीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) (सुधारणा) अधिनियम, २००४ मध्ये विश्वस्त व्यवस्था निधीच्या विनियोगासंदर्भातील नियम २१(२) (दोन) मधील तरतूद पुढीलप्रमाणे आहे:-

स्थानिक नागरी सेवा व सुविधा यांच्यामध्ये सुधारणा व वाढ होण्यासाठी व परिणामी संस्थानाच्या सोयीमध्ये वाढ होण्यासाठी शिर्डी नगरपंचायतीला सहाय्य करण्यासाठी विश्वस्त व्यवस्था निधीचा विनियोग करेल.

२. उपरोक्त नमूद अधिनियमातील तरतुदीनुसार, शिर्डी शहरातील २४ रस्त्यांच्या विकसनासाठी रु.८.९८ कोटी इतके अनुदान शिर्डी नगरपंचायतीस उपलब्ध करुन देण्यास तसेच सदर कामे निविदा प्रक्रीयेसह शिर्डी नगरपंचायतीमार्फत करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अट:- सदर शिर्डी शहरातील २४ रस्त्यांची गुणवत्ता राखली जाईल, यासाठी "तांत्रिक तपासणी त्रयस्थ संस्था" श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांच्यामार्फत नियुक्त करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१९०११०१५३२३१३०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2019.01.10 15:41:41 +05'30'

**( सु.प. साळुंके )**
कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.

**प्रति**:- १) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) जिल्हाधिकारी, अहमदनगर
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर,
६) मुख्याधिकारी, नगरपंचायत, शिर्डी
७) निवड नस्ती/का.१६